# बीजगणिताचीं मूलतत्वें.

ह्या विषयाचा मूळ ग्रंथ इंग्रेजी भाषेंत हाडन् साहेबानें केला,

त्याचें हें मराठी भाषांतर

## दाजी नीळकंठ नगरकर

ह्यांनीं करून दक्षिणाप्रैज कमेटीस नजर केलें,

तें

## कृष्णशास्त्री गोडबोले

ह्यांनीं तपासून शुद्ध केलें, तें

मेहेरबान डैरेक्टर आफ पब्लिक इन्स्त्रक्शन ह्यांचे हुकुमावरून

पुणें पाठशाळेकडील छापखान्यांत छापिलें.

मुकाम पुणें.

छापणार नांगरामचंद्र ठकार क० छा०

सन १८५८



# सूचना.

मूळपुस्तकांत कितीएक ठिकाणीं हस्तदोषांसारख्या कांहीं चुक्या होत्या त्या नीट केल्या; कितीएक ठिकाणीं कितीएक विषयांचीं कलमें फार संक्षेपानें लिहिल्यामुळें शिकणाऱ्यांस समजण्यास कठीण झालीं होतीं तीं इतरपुस्तकांच्या साह्यानें वाढवून समजण्या जोगीं केलीं; कितीएक प्रश्नांचीं उत्तरें असंभविक दिसतात तीं खरीं आहेत असें समजण्याकरितां कितीएकजागीं टिपा लिहिल्या; अशारीतीनें विद्यार्थ्यांस चांगलें सुलभ वाटाया जोगें जितकें करवलें तितकें केलें आहे.

मुकाम पुणें }
माहे फब्रुआरी सन १८५८ }

# प्रस्तावना.



ज्यास बीजगणिताचें बरेंच ज्ञान झालें आहे, त्याच्या अनुभवासही गोष्ट आली असेल, कीं जोंपर्यंत त्यास समीकरणाच्या स्वरूपाचें ज्ञान झालें नव्हतें, तोंपर्यंत त्यास बीजगणिताचा अभ्यास करण्यांत कांहीं गोडी लागत नव्हती, आणि म्हणूनच बीजगणिताचे अभ्यासापासून त्याचे चित्तास समाधान वाटत नव्हतें; कांकीं तो शिकत असतां त्यास असे कितीएक विषय आले, कीं जे सहज समजण्याजोगे नव्हते, आणि त्यानें श्रम करून कांहीं नियम समजून घेतले असतां ही त्यांचा उपयोग त्यास त्यावेळीं समजत नव्हता अशा स्थितींत, ही विद्याच निरुपयोगी आहे, असें ही केव्हां केव्हां त्याचे मनांत आल्यावांचून राहिलें नाहीं

ह्या पुस्तकांत विषयांची रचना अशी केली आहे, कीं विद्यार्थ्यास बेरीज, वजाबाकी, गुणाकार, आणि भागाकार करतां येण्यापुरते मूळभूत नियम माहीत झाले न झाले तोंच त्यानें समीकरणाचे स्वरूपाचा विचार करूं-

## प्रस्तावना.

लागावा. आणि त्यास जें काय थोडकेंसें ज्ञान प्राप्त झालें असेल त्याचे योगानें त्यानें कांहीं प्रश्न सोडवावे. असेंच, त्यास बीजांतील अपूर्णपद नियमांची माहिती झाली म्हणजे त्याच्या वाढलेल्या ज्ञानाचे योगानें त्यास सोडवतां येतील, अशीं कांहीं समीकरणें आणि प्रश्न अपूर्णबीजपद ह्या विषयांपुढें दिले आहेत.

अलीकडे जे मोठमोठे गणिती झाले त्यांपैकीं एकानें असें लिहिलें आहे, कीं गणित वगैरे विद्या शिकवितेवेळेस उदाहरणांच्या योगानें विद्यार्थ्यांचे मनांत त्या विद्यांचीं मूलतत्वें आणून देण्याची रीति नुसते नियम सांगण्याच्या रीतीपेक्षां चांगली आहे; आणि जो शिकविण्याचे कामांत वहिवाटलेला आहे तो ह्या मतास अनुसरेल. अभ्यास करते वेळेस विद्यार्थ्यास कांहीं साहाय्य मिळावें, ह्या हेतूनें ह्या पुस्तकांतील बहुतएक विषयांत कांहीं उदाहरणें व प्रश्न सोडवून त्यांत नियमांचें बरेंच स्पष्टीकरण केलें आहे.

---

# अनुक्रमणिका.

# अनुक्रमणिका.

## प्रकरण ८



## प्रकरण ९.



## प्रकरण १०.



## प्रकरण ११.



## प्रकरण १२.



## प्रकरण १३.



## प्रकरण १४.





# बीजगणित.

## प्रकरण १

(१) ज्यां विद्येंत विवक्षित संख्येचें किंवा संख्यांचें सामान्यतः अक्षरांनीं व कार्यप्रकाशकचिन्हांनीं प्रदर्शन केलें असतें, त्या विद्येस **बीजगणित** असें म्हणतात. त्यांत जीं अक्षरें येतात तीं दोन जातींचीं पदें दाखवितात. **अ**, **ब**, **क**, इत्यादि अक्षरें व्यक्तपदें दाखवितात, आणि **क्ष**, **य**, **ज्ञ**, इत्यादि अक्षरें अव्यक्त पदें दाखवितात.

ह्या गणितांत ज्या कार्यप्रकाशकचिन्हांची योजना करितात तीं चिन्हें लिहितों.

= ह्या चिन्हास **बरोबरीचें** चिन्ह असें म्हणतात.

+ ह्यास **धन** चिन्ह म्हणतात. हें चिन्ह **बेरीज** दाखवितें. उदाहरण, जसें ३ + ५ = ३ आणि ५ ह्यांची बेरीज = ८; तसें, **अ**+**ब**=**अ** आणि **ब** ह्यांची बेरीज.

— ह्यास **ऋण** चिन्ह म्हणतात. हें चिन्ह **वजाबा**-

की दाखविते. उदाहरण, जसें ५-२= पांच आणि दोन ह्यांची वजाबाकी=३; तसें, **ब-क** = **ब** आणि **क** ह्यांची वजाबाकी.

जेव्हां **क्ष** आणि **य** ह्या दोन पदांतून मोठें कोणतें व लहान कोणतें हें कळत नाहीं, तेव्हां ह्यांचें अंतर ~ ह्या चिन्हानें दाखवितात. म्हणजे **क्ष~य**.

किंवा · ह्यास **गुणन** चिन्ह म्हणतात. हें **गुणाकार** दाखवितें. उदाहरण, २**क**×३**ड**= दुप्पट **क** आणि तिप्पट **ड** ह्यांचा गुणाकार. येथें दोहोंस **क**चा **वेळाप्रकाशक** किंवा **गुणक** म्हणतात, आणि तिहींस **ड**चा **वेळाप्रकाशक** किंवा **गुणक** म्हणतात. **अक्ष** आणि **बक्ष** ह्यांचा अर्थ **अ**×**क्ष** आणि **ब**×**क्ष** असा आहे. येथें **अ** आणि **ब** ह्यास **क्ष**चें **अक्षर** वेळाप्रकाशक म्हणतात. कधीं कधीं गुणाकार पुढें सांगितल्या रीतीप्रमाणें लिहितात. (**अ**+**ब**)·(**क**−**ड**) किंवा (**अ**+**ब**)(**क**−**ड**) किंवा $\overline{अ+ब}\cdot\overline{क-ड}$ ह्याचा अर्थ असा आहे कीं, **अ** आणि

ब ह्यांच्या बेरजेस क आणि ड ह्यांच्या वजा-
बाकीनें गुणावें. अब+क, ह्याचा अर्थ अ-
सा आहे कीं, अ आणि ब ह्यांचा गुणाकार
करून त्यांत क मिळवावा. जर अ=२,ब=३,
आणि क=१, अशा संख्या धरल्या तर अब+
क=२×३+१=७. अ(ब+क), ह्याचा
अर्थ असा आहे कीं, ब आणि क ह्यांचे बेर-
जेस अनें गुणावें; वरचे प्रमाणेंच जर अ=२,
ब=३, आणि, क=१, अशा संख्या धरिल्या तर,
अ(ब+क)=२(३+१)=२×४=८ होतात.

ह्या चिन्हास भाजनचिन्ह म्हणतात. हें चिन्ह
भागाकार दाखवितें. उदाहरण, म÷न किंवा
प्रसिद्ध रीतीच्या अन्वयें $\frac{\text{म}}{\text{न}}$ ह्याचा अर्थ ननें म-
ला भागावें असा आहे. जर म=६ आणि न=२
असें धरलें तर, $\frac{\text{म}}{\text{न}}=\frac{\text{६}}{\text{२}}=\text{३}$ होतात.

ह्या चिन्हास प्रमाणचिन्ह म्हणतात. उदाह-
रण, अ:ब::क:ड. ह्याचा अर्थ असा आ-
हे कीं, अ आणि ब ह्यांच्या मध्यें जें प्रमाण
आहे, तेंच प्रमाण क आणि ड ह्यांच्या मध्यें

आहे.

$\sqrt{}$ किंवा $\sqrt{\ }$ ह्यांस मूळचिन्हें म्हणतात. उदाहरण, $\sqrt{क्ष}$ म्हणजे क्षचें वर्गमूळ होय.

$\sqrt[3]{क्ष+य}$ म्हणजे क्ष आणि य ह्यांचे बेरजेचें घनमूळ होय.

२, ३, ४, इत्यादि चिन्हें पदांच्या डोक्यावर मांडलीं असतां तीं त्या पदांचे ते ते घात दाखवितात. उदाहरण, $क्ष^{२}$ म्हणजे क्षचा वर्ग (म्हणजे दुसरा घात) होय. $(क्ष+ज्ञ)^{४}$ किंवा, $\overline{क्ष+ज्ञ}^{४}$ म्हणजे क्ष आणि ज्ञ ह्यांचे बेरजेचा चतुर्घात. जर, क्ष=६ आणि ज्ञ=४ धरले, तर $(क्ष+ज्ञ)^{४}=(६+४)^{४}=(१०)^{४}=१००००$ होतील.

सांगितलेल्या चिन्हांखेरीज आणखी दुसरीं चिन्हें आहेत तीं नुसतींच लिहून दाखवितों. कारण, तीं विवरण केल्यावांचून समजण्याजोगीं आहेत.

ह्याचा अर्थ कारण कीं, $\therefore$ ह्याचा अर्थ म्हणून. $\propto$ ह्याचा अर्थ प्रमाणानें विकार पावणें. $>$ ह्याचा अर्थ पेक्षां मोठें. $<$ ह्याचा अर्थ पेक्षां लहान. $\infty$ ह्याचा अर्थ अनंतत्व. आणि $\pm$ ह्याचा

र्थ **अधिक** किंवा **उणें** .

उदाहरण १, $\text{अ}=३$, $\text{ब}=२$, आणि $\text{क}=४$, असें धरून पुढील पदांची संख्या काढ .

१, $\text{अ}+३\text{ब}+\text{क}$; ह्यांची संख्या काय होती ?

उत्तर, १२

२, $४\text{अ}+२\text{ब}-\text{अक}$ ह्यांची संख्या काय होती ?

उत्तर, ४

३, $\text{अ}^{२}+\text{ब}(\text{क}-\text{अ})$; ह्यांची संख्या काय होती ?

उत्तर, ११

४, $५(\text{अ}+\text{ब}^{३}-२\text{क})$; ह्यांची संख्या काय होती ?

उत्तर, १५

उदाहरण २, जेव्हां $\text{क्ष}=४$, $\text{य}=३$, $\text{ज्ञ}=१$, आणि $\text{न}=२$, आहेत तेव्हां पुढील पदांची संख्या काढ .

१, $\text{न}(\text{क्ष}+\text{य}-\text{ज्ञ})$; ह्यांची संख्या काय होती ?

उत्तर, १२

२, $\dfrac{\text{क्ष}^{३}+\text{य}^{३}-९\text{ज्ञ}}{८\text{न}+१}$ ह्यांची संख्या काय होती ?

उत्तर, २

३, $\dfrac{\text{क्ष}^{३}}{८}-\dfrac{\text{य}^{२}}{३}+\text{न ज्ञ}$; ह्यांची संख्या काय होती ?

उत्तर, ७

४, (क्ष$^2$-य$^2$)-(क्ष-य)$^2$+न(क्ष-य-ज्ञ);

ह्यांची संख्या काय होती?

उत्तर, ६

(२) ज्या पदांतलीं अक्षरें एकसारखींच असतात त्यांस **सरूपपदें** म्हणतात. जसें, २**अ**, ५**अ**; ७**क्ष$^2$**, ४**क्ष$^2$**, आणि **अक्षय**, २**अक्षय**, १०**अक्षय**; इत्यादि.

ज्या पदांचीं अक्षरें भिन्न भिन्न असतात, त्यांस **विरूपपदें** म्हणतात. जसें, २अ, २ब, ५अय;

ज्या पदांच्या पूर्वीं + हें चिन्ह असतें, किंवा कोणतेंही चिन्ह नसतें त्या पदांस **धनपदें** म्हणतात.

ज्या पदांच्या पूर्वीं – हें चिन्ह असतें, त्या पदांस **ऋणपदें** म्हणतात.

एका पुरुषाजवळ २रुपये आहेत असें मानलें तर, त्याजवळ वास्तविक २रुपये आहेत, म्हणून ते +२ रुपये आहेत, असें म्हणावें. आतां त्यांतील १रुपया त्यानें खर्चिल्यास त्याजवळ वास्तविक एक रुपया राहिला तो +१ रुपया असें म्हणावें. पुढें त्यानें तोही रुपया खर्चिल्यास त्याजवळ वास्तविक कांहीं राहिलें नाहीं;

म्हणून त्याजपाशीं ० आहे असें म्हणावें.

आतां आपण असें समजूं कीं, त्यानें एक रुपया कर्ज घेतला तर त्याला एक रुपया कर्ज झाला, म्हणून −१ रुपया आहे असें म्हणावें. पुढें त्यानें आणखी एक रुपया कर्ज घेतला अशी कल्पना केल्यास त्यास एकंदर दोन रुपये कर्ज झाले म्हणून त्याजवळ −२ रुपये आहेत असें म्हणावें

(३) बीजगणितांतील प्रत्येक पदास **अंकरूप** वेळाप्रकाशक असतो. तो कधीं कधीं लिहितात, व कधीं कधीं लिहीत नाहींत. जेथें वेळाप्रकाशक लिहिलेला नसतो तेथें १ हा वेळाप्रकाशक आहे असें समजावें. म्हणून, जसें; ३ घोडे, ५ घोडे, आणि १ घोडा मिळून ९ घोडे होतात; तसें, ३ अ, ५ अ, आणि अ, मिळून ३ अ + ५ अ + १ अ = ९ अ होतात. आणि जसें, धान्याच्या १० गोण्या आहेत त्यांतून एक गोणी काढिली म्हणजे ९ गोण्या राहतात, तसें १० क्ष − क्ष = १० क्ष − १ क्ष = ९ क्ष होतात.

---

# बेरीज.

## उदाहरणें.

पहिलें, २अ+ब, ३अ+२ब, अ+५ब, आणि ३ब+४अ; ह्यांची बेरीज कर.

| | |
|---|---|
| २अ+ब. | |
| ३अ+२ब. | येथें २अ+३अ+१अ+४अ=१०अ |
| अ+५ब. | आणि १ब+२ब+५ब+३ब=११ब |
| ४अ+३ब. | ∴ एकंदर बेरीज १०अ+११ब आहे. |
| **१०अ+११ब** हें उत्तर. | |

दुसरें, ३क्ष−२य, ६क्ष+४य, −क्ष−३य, आणि −य−५क्ष; ह्यांची बेरीज कर.

| | |
|---|---|
| ३क्ष−२य | येथें ३क्ष+६क्ष−१क्ष−५क्ष=९क्ष−६क्ष=३क्ष |
| ६क्ष+४य | आणि ४य−२य−३य−१य=४य−६य=−२य |
| −क्ष−३य | ∵ −६य=−४य−२य, ∴ ४य−६य=४य−४य−२य |
| −५क्ष−य | =०−२य=−२य |
| **३क्ष−२य** हें उत्तर. | ∴ एकंदर बेरीज ३क्ष−२य |

तिसरें, क्ष$^{२}$−३क्षय+२य$^{२}$, य$^{२}$−४क्ष$^{२}$+क्षय, आणि क्षय−५य$^{२}$+३क्ष$^{२}$, ह्यांची बेरीज कर.

| | |
|---|---|
| क्ष$^{२}$ − ३क्षय + २य$^{२}$ | येथें क्ष$^{२}$ + ३क्ष$^{२}$ − ४क्ष$^{२}$ = ४क्ष$^{२}$ − ४क्ष$^{२}$ = ० |
| −४क्ष$^{२}$ + क्षय + य$^{२}$ | आणि १क्षय + १क्षय − ३क्षय = २क्षय − ३क्षय = −१क्षय |
| ३क्ष$^{२}$ + क्षय − ५य$^{२}$ | ∴ २य$^{२}$ + य$^{२}$ − ५य$^{२}$ = ३य$^{२}$ − ५य$^{२}$ = −२य$^{२}$ |
| उत्तर, − क्षय − २य$^{२}$ | ∴ एकंदर बेरीज − क्षय − २य$^{२}$ |

चवथें, २अ + २ब, अ + ३ब, ५अ + ब, आणि ८अ + ब, ह्यांची बेरीज कर.

उत्तर, १६अ + ७ब.

पांचवें, २क्ष − ४य, −३क्ष + य, ६क्ष − ५य, आणि २य − क्ष, ह्यांची बेरीज कर.

उत्तर, ४क्ष − ६य.

साहावें, २क्ष$^{२}$ + क्षय − २य$^{२}$, ३क्षय − य$^{२}$ − ४क्ष$^{२}$, ५य$^{२}$ − क्ष$^{२}$ − ६क्षय, आणि ४क्ष$^{२}$ − क्षय + ३य$^{२}$, ह्यांची बेरीज कर.

उत्तर, क्ष$^{२}$ − ३क्षय + ५य$^{२}$

सातवें, अक्ष$^{२}$ + बक्ष$^{२}$ − कक्ष, २अक्ष$^{२}$ + ४कक्ष − ५बक्ष$^{२}$, आणि २बक्ष$^{२}$ − अक्ष$^{२}$ − ८कक्ष, ह्यांची बेरीज कर.

उत्तर, २अक्ष$^{२}$ − २बक्ष$^{२}$ − ५कक्ष

आठवें, अ − ब व अ + ब; क्ष$^{२}$ + क्षय व क्षय

+ये; आणि ये—क्ष्ज्ञ व क्ष ज्ञ—ज्ञे; ह्यांची बेरीज कर.

उत्तर, २अ; क्षे + २क्षय + ये; आणि ये—ज्ञे.

## वजाबाकी.

(४) समजा कीं, अजवळ ३क्ष रुपये आहेत, व तो ते कधीं खर्चीत नाहीं. आणि बजवळ २क्ष रुपये आहेत, व तो दररोज क्ष रुपये खर्चतो. ह्या उदाहरणांत अचा पैसा दररोज बच्यापेक्षां किती वाढत चालला हें पाहावयाचें आहे.

| | १ दिवस | २ दिवस | ३ दिवस | ४ दिवस | ५ दि॰ |
|---|---|---|---|---|---|
| अचा पैसा | ३क्ष | ३क्ष | ३क्ष | ३क्ष | ३क्ष |
| बचा पैसा | २क्ष | क्ष | ०क्ष | —क्ष | —२क्ष |
| बाकी | क्ष | २क्ष | ३क्ष | ४क्ष | ५क्ष |

ह्या सर्व बाक्या अचा पैसा दररोज बच्यापेक्षा पेक्षां किती अधिक होत चालला हें दाखवितात, व ह्या वजाबाकीनें निघाल्या आहेत; परंतु ज्या रकमा वजा करावयाच्या आहेत, त्यांचीं चिन्हें पहिल्यानें बदललीं असतां त्याच बाक्या बेरजेनें ही येतील;

म्हणजे,

| | १ दिवस | २ दिवस | ३ दिवस | ४ दिवस | ५ दि० |
|---|---|---|---|---|---|
| अचा पैसा | ३ क्ष | ३ क्ष | ३ क्ष | ३ क्ष | ३ क्ष |
| बचा पैसा | – २ क्ष | – क्ष | – ० क्ष | + क्ष | + २ क्ष |
| बाकी | क्ष | २ क्ष | ३ क्ष | ४ क्ष | ५ क्ष |

त्यावरून बीजपदें वजा करण्याचा जो नियम सिद्ध होतो तो लिहितों. तो नियम हा कीं, जीं पदें वजा करावयाचीं असतील त्यांचीं चिन्हें पालटलीं, असें पहिल्यानें मनांत आणून मिळवणीच्या रीतीप्रमाणें उदाहरण करावें.

(५) कोणत्याही पदाच्या पूर्वी – हें चिन्ह असलें म्हणजे तें सर्व पद वजा करावयाचें आहे असें समजावें. जसें, अ–(ब+क); ह्याचा अर्थ असा आहे कीं, (ब+क) हे अ मध्यें वजा करावयाचे आहेत, म्हणून अ–(ब+क)=अ–ब–क. तसेंच, अ–(ब–क+ड)=अ–ब+क–ड आणि क्ष–{अ–(ब–क)}=क्ष–{अ–ब+क}=क्ष–अ+ब–क.

# उदाहरणें.

पहिलें, ४ अ − ८ ब − २ क ह्यांतून अ + २ ब − ५ क हें वजा कर.

वजाबाकीचे नियमाप्रमाणें,

| | |
|---|---|
| ४ अ − ८ ब − २ क | + ४ अ − १ अ = + ३ अ |
| अ + २ ब − ५ क | − ८ ब − २ ब = − १० ब |
| | − २ क + ५ क = + ३ क |

उत्तर, ३ अ − १० ब + ३ क

ताळा. ४ अ − ८ ब − २ क

दुसरें, २ मक्ष$^{२}$ − नक्ष − ३ पय + र ह्यांतून ५ मक्ष$^{२}$ − ४ नक्ष + पय + क हें वजा कर.

वजाबाकीचे नियमाप्रमाणें

| | |
|---|---|
| २ मक्ष$^{२}$ − नक्ष − ३ पय + र | २ मक्ष$^{२}$ − ५ मक्ष$^{२}$ = − ३ मक्ष$^{२}$ |
| ५ मक्ष$^{२}$ − ४ नक्ष + पय + क | − नक्ष + ४ नक्ष = + ३ नक्ष |
| | − ३ पय − १ पय = − ४ पय |
| उ० − ३ मक्ष$^{२}$ + ३ नक्ष − ४ पय + र − क | आणि र − क = र − क |

तिसरें, ६ अ + २ ब − (३ अ + ब) ह्यांतून २ अ + ४ ब − (४ अ − ब) हें वजा कर.

६अ+२ब-३अ-ब
२अ+४ब-४अ+ब

४अ-२ब+अ-२ब=
५अ-४ब हें उत्तर.

येथें -(३अ+ब) आणि -(४अ-ब) हे लिहावयाच्या वेळेस कौंसाच्या बाहेर उणें चिन्ह आहे म्हणून आंतील पदांचीं चिन्हें पहिल्यानें बदलावीं.

चवथें, ५अ-६ब-३क ह्यांतून २अ+३ब-७क हे वजा कर.

उत्तर, ३अ-९ब+४क.

पांचवें, क्ष$^2$-क्षय ह्यांतून क्षय-य$^2$ हे वजा कर आणि अ+ब ह्यांतून अ-ब हे वजा कर.

उत्तर. क्ष$^2$-२क्षय+य$^2$ आणि २ब.

साहावें, ५न$^2$+न-२ ह्यांतून ४न$^2$-३न-२ हे वजा कर.

उत्तर, न$^2$+४न-१.

सातवें, अय$^2$-७अ$^2$य-अ-क ह्यांतून +३अय$^2$-२अ$^2$य+अ-ब हे वजा कर.

उत्तर, -२अय$^2$-५अ$^2$य-२अ-क+ब.

आठवें, अ$^3$-अ$^2$ब+२अब$^2$-ब$^3$ ह्यांतून २अ$^2$ब-अब$^2$ हे वजा कर.

उत्तर, अ$^3$-३अ$^2$ब+३अब$^2$-ब$^3$.

# गुणाकार.

(९) ३+२ ह्यांस ४ ह्यांनीं गुण.

३+२=५ आणि ५×४=२० हें उत्तर

अथवा प्रकारांतरानें

(३+२)×४=३×४+२×४=१२+८=२० हें उत्तर.

अ+ब ह्यांस ड आणि क ह्यांनीं गुणून त्या दोन्ही गुणाकारांची बेरीज कर.

(अ+ब)×क = अक+बक

(अ+ब)×ड = अड+बड

अक+बक+अड+बड हें उ०

ही गुणाकारांची बेरीज व अ+ब ह्यांस क+ड ह्यांनीं गुणिल्यास जो गुणाकार येतो तो ह्या दोहोंत भेद नाहीं; म्हणजे,

अ+ब
क+ड

अक+बक
+अड+बड

अक+बक+अड+बड

येथें अ+ब ह्यांस पहिल्यानें कनें गुणिलें, आणि

मग डनें गुणिलें, नंतर त्या दोन्ही गुणाकारांची बेरीज घेतली.

५–३ ह्यांस ६ ह्यांनीं गूण.

५–३ = २ आणि २ × ६ = १२ हें उत्तर.

अथवा (५–३) × ६ = ५×६ – ३×६ = ३० – १८ = १२ हें उत्तर.

अ+ब ह्यांस क आणि ड ह्यांनीं गूण. आणि पहिल्या गुणाकारांतून दुसरा गुणाकार वजा कर.

(अ–ब) × क = अक–बक

(अ–ब) × ड = अड–बड

अक–बक–अड+बड हें उत्तर

ही बाकी अ–ब आणि क–ड ह्यांच्या गुणाकाराबरोबर आहे; म्हणजे.

अ–ब

क–ड

अक–बक

–अड+बड

अक–बक–अड+बड

येथें अ–ब ह्यांस पहिल्यानें कनें गुणिलें आणि मग डनें गुणिलें, नंतर त्या दोन्ही गुणाकारांची बेरीज घेतली.

ह्या उदाहरणाचा विचार करून पाहिला असतां लागलेंच लक्षांत येतें कीं, + ह्यास + ह्यानें गुणिलें असतां गुणाकार + येतो; − ह्यास − ह्यानें गुणिलें असतां गुणाकार + येतो; + ह्यास − ह्यानें किंवा − ह्यास + ह्यानें गुणिलें असतां गुणाकार − येतो; म्हणजे असा नियम निघतो कीं, **सरूप** चिन्हांचा गुणाकार + येतो आणि **विरूप** चिन्हांचा गुणाकार − येतो.

२क्ष त्यांस ३ ह्यांनीं गूण.

२क्ष × ३ = २क्षची तिप्पट = २क्ष + २क्ष + २क्ष = ६क्ष

अथवा, २ × क्ष × ३ = ६क्ष.

२ ह्या वेळाप्रकाशाकास ३ ह्या गुणकानें गुणून त्या गुणाकारापुढें क्ष लिहिला म्हणजे वरलें उत्तर येईल.

५अ त्यांस २ब त्यांनीं गूण.

५ × अ × २ × ब = ५ × २ × अ × ब = १० अब.

५ आणि २ ह्या वेळाप्रकाशाकांच्या गुणाकारापुढें अ आणि ब हीं अक्षरें लिहावीं म्हणजे वरलें उत्तर येईल.

$अ^{२}$ त्यास $अ^{३}$ त्यानें गूण.

$अ^{२} = अ \times अ$, आणि $अ^{३} = अ \times अ \times अ$.

$\therefore अ^{२} \times अ^{३} = अ \times अ \times अ \times अ \times अ = अ^{५}$.

अथवा, $अ^{२} \times अ^{३} = अ^{२+३} = अ^{५}$.

२ आणि ३ ह्या घातप्रकाशकांची बेरीज अ पदाच्या घातप्रकाशकाच्या स्थानीं लिहावी, म्हणजे वरलें उत्तर येईल.

जेथें घातप्रकाशक लिहिला नाहीं, तेथें १ हा घातप्रकाशक आहे असें समजावें. जसें, $अ = अ^{१}$.

ह्यावरून गुणाकाराचे जे सामान्य नियम सिद्ध होतात ते खालीं लिहितों.

गुण्य गुणक पदांचीं चिन्हें सरूप असतील तर गुणाकारास + चिन्ह लिहावें; व तीं विरूप असतील तर − चिन्ह लिहावें. गुण्य गुणक पदांच्या वेळाप्रकाशकांचा गुणाकार घ्यावा. गुण्य गुणक पदांत एकच अक्षर असेल तर, त्यांच्या घातप्रकाशकांची बेरीज घ्यावी.

## उदाहरणें.

पहिलें. $३अ^{२} - ५अब + २ब^{२}$ ह्यांस $अ^{२} - ७अब$ ह्यांनीं गूण.

$$३अ^{२} - ५अब + २ब^{२}$$
$$\underline{अ^{२} - ७अब}$$

$$\begin{array}{r} ३अ^४-५अ^३ब+२अ^२ब^२ \\ -२१अ^३ब+३५अ^२ब^२-१४अब^३ \\ \hline ३अ^४-२६अ^३ब+३७अ^२ब^२-१४अब^३ \end{array}$$ हें उत्तर.

दुसरें. $अ^न-अ^{न-१}ब+अ^{न-२}ब^न$ ह्यांस $अ-ब$ ह्यांनीं गूण.

$$\begin{array}{l} अ^न-अ^{न-१}ब+अ^{न-२}ब^न \\ अ-ब \\ \hline अ^{न+१}-अ^नब+अ^{न-१}ब^न \\ \quad -अ^नब+अ^{न-१}ब^२-अ^{न-२}ब^{न+१} \\ \hline अ^{न-१}-२अ^नब+अ^{न-१}ब^न+अ^{न-१}ब^२-अ^{न-२}ब^{न+१} \end{array}$$

हें उत्तर.

तिसरें. ६अ ह्यांस ४ ह्यांनीं; ३अ ह्यांस ५ब ह्यांनीं; आणि $क्ष^४$ ह्यांस $क्ष^२$ ह्यानें गूण.

उत्तर. २४अ; १५अब; आणि $क्ष^६$.

चवथें. २क्ष−४य+झ त्यांस ३क्ष ह्यांनीं; आणि $अ^२+२अब-ब^२$ ह्यांस $अ^२ब^२$ ह्यांनीं गूण.

उत्तर. $६क्ष^२-१२क्षय+३क्षझ$; आणि $अ^४ब^२+२अ^३ब^३-अ^२ब^४$.

पांचवें. $क्ष^३-क्ष^२य+क्षय^२-य^३$ ह्यांस क्ष+य ह्यांनीं;

आणि $अ^{२} + ब^{२} + क^{२} + अब - अक + बक$ ह्यांस $अ - ब + क$ ह्यांनीं गूण.

उत्तर. $क्ष^{६} - य^{६}$; आणि $अ^{३} - ब^{३} + क^{३} + ३अबक$

साहावें. $५क्ष^{३} + ४क्ष^{२} + ३क्ष + २$ ह्यांस $५क्ष^{३} - ४क्ष^{२}$ ह्यांनीं; आणि $१ - क्ष + क्ष^{४} - क्ष^{५}$ ह्यांस $१ + क्ष + क्ष^{२} + क्ष^{३}$ ह्यांनीं गूण.

उत्तर. $२५क्ष^{६} - क्ष^{४} - २क्ष^{३} - ८क्ष^{२}$; आणि $१ - क्ष^{८}$

सातवें. $अ + ब$ ह्यांस $अ + ब$ ह्यांनीं, $अ - ब$ ह्यांस $अ - ब$ ह्यांनीं, आणि $अ + ब$ ह्यांस $अ - ब$ ह्यांनीं गूण; आणि तीं उत्तरें लक्ष्यांत ठेव.

उत्तर. $(अ + ब)(अ + ब) = अ^{२} + २अब + ब^{२}$;
$(अ - ब)(अ - ब) = अ^{२} - २अब + ब^{२}$;
आणि $(अ + ब)(अ - ब) = अ^{२} - ब^{२}$.

ह्या उदाहरणावरून खालचे नियम निघतात.

१. कोणत्याही दोन संख्यांचे बेरजेचा वर्ग, त्या दोन संख्यांच्या वर्गांची बेरीज त्यांच्या गुणाकाराच्या दुपटींत मिळवून जे येतें, त्या बरोबर आहे.

२. कोणत्याही दोन संख्यांच्या वजाबाकीचा वर्ग, त्या संख्यांच्या वर्गांच्या बेरजेंत त्यांच्या गुणाकारा-

ची दुप्पट वजा देऊन बाकी जी राहते, तीबरोबर आहे

३ कोणत्याही दोन संख्यांच्या बेरजेचा व वजाबाकीचा गुणाकार त्याच्या वर्गांच्या वजाबाकीबरोबर आहे.

विद्यार्थ्यांनीं ह्या तीन नियमांची चांगली आठवण धरावी.

## भागाकार

(१७) भागाकार गुणाकाराची विपरीतक्रिया आहे

∵ $२क्ष \times ३ = ६क्ष$; ∴ $६क्ष \div ३$, अथवा $\frac{६क्ष}{३} = २क्ष$; आणि ∵ $-५क्ष^{४} \times ४क्ष^{२} = -२०क्ष^{६}$; ∴ $\frac{-२०क्ष^{६}}{४क्ष^{२}} = -५क्ष^{४}$.

ह्यावरून भागाकाराचा नियम सिद्ध होतो; तो हा कीं, भाज्यभाजकांचीं चिन्हें सरूप असल्यास भागाकारास + चिन्ह लिहावें; तीं चिन्हें विरूप असल्यास − चिन्ह लिहावें; भाज्याच्या वेळाप्रकाशकास भाजकाच्या वेळाप्रकाशकानें भागावें; आणि भाज्यभाजकपदांत एकच अक्षर असल्यास भाज्याच्या घातप्रकाशकांत भाजकाचा घातप्रकाशक वजा करावा.

# उदाहरणें

पहिलें. $-१८ अ^{३}बक^{५}$ त्यांस $-३ अ^{२}बक^{३}$ ह्यांनीं भाग.

$$\frac{-१८ अ^{३}बक^{५}}{-३ अ^{२}बक^{३}} = ६ अक^{२}$$ हें उत्तर.

त्या उदाहरणांत चिन्हें सरूप आहेत म्हणून भागाकाराचें चिन्ह + समजावें; ३ हे १८ यांतून ६ वेळा जातात; २ हा घातप्रकाशक ३ ह्यांत वजा केल्यास भागाकारांतल्या अस १ हा घातप्रकाशक उरतो; ब हा भाज्यांकांत आणि भाजकांत आहे, म्हणून तो भागाकारांत आला नाहीं, कारण, $\frac{ब}{ब}=१$ आहे; आणि ३ हा घातप्रकाशक पांचांतून वजा केल्यामुळें भागाकारांत कम २ घातप्रकाशक उरतो.

दुसरें. $१२ अ^{३}क्ष^{४}य^{३} - २४ अ^{२}क्ष^{३}य^{४} - १८ क्ष^{३}य + ६ क्षय$ ह्यांस $-६ क्षय$ ह्यांनीं भाग.

$$\frac{१२ अ^{३}क्ष^{४}य^{३} - २४ अ^{२}क्ष^{३}य^{४} - १८ क्ष^{३}य + ६ क्षय}{-६ क्षय} =$$

$-२ अ^{३}क्ष^{३}य^{२} + ४ अ^{२}क्ष^{२}य^{३} + ३ क्ष^{२} - १$ हें उत्तर

तिसरें. $२अ^{६} - ७अ^{५}ब + ७अ^{४}ब^{२} + अ^{३}ब^{३} - १५अ^{२}ब^{४}$ ह्यास $२अ^{३} - ३अ^{२}ब - ५अब^{२}$ ह्यांनी भाग.

$$
\begin{array}{l|l|l}
२अ^{३} & २अ^{६} - ७अ^{५}ब + ७अ^{४}ब^{२} + अ^{३}ब^{३} - १५अ^{२}ब^{४} & अ^{३} \\
-३अ^{२}ब & \underline{२अ^{६} - ३अ^{५}ब - ५अ^{४}ब^{२}} & -२अ^{२}ब \\
-५अब^{२} & \quad -४अ^{५}ब + १२अ^{४}ब^{२} + अ^{३}ब^{३} & +३अब^{२}. \\
 & \quad \underline{-४अ^{५}ब + ६अ^{४}ब^{२} + १०अ^{३}ब^{३}} & \\
 & \qquad ६अ^{४}ब^{२} - ९अ^{३}ब^{३} - १५अ^{२}ब^{४} & \\
 & \qquad \underline{६अ^{४}ब^{२} - ९अ^{३}ब^{३} - १५अ^{२}ब^{४}} &
\end{array}
$$

चवथें. १ ह्यास $१ + २क्ष + क्ष^{२}$ ह्यांनी भाग.

$$
\begin{array}{l}
१ + २क्ष + क्ष^{२}) \; १ \; (१ - २क्ष + ३क्ष^{२} - ४क्ष^{३} + \text{इत्यादि अनंत पर्यंत.} \\
\quad \underline{१ + २क्ष + क्ष^{२}} \\
\quad -२क्ष - क्ष^{२} \\
\quad \underline{-२क्ष - ४क्ष^{२} - २क्ष^{३}} \\
\qquad ३क्ष^{२} + २क्ष^{३} \\
\qquad \underline{३क्ष^{२} + ६क्ष^{३} + ३क्ष^{४}} \\
\qquad -४क्ष^{३} - ३क्ष^{४}
\end{array}
$$

पांचवें. $अ^{२न+१} - अ^{न+१} - अ^{न} + अ^{न-१}$ ह्यास $अ^{न-१}$ ह्यानें भाग.

$$\frac{अ^{२न+१}-अ^{न+१}-अ^{न}+अ^{न-१}}{अ^{न+१}}=अ^{न+२}-अ^{२}-अ+१$$

ह्या भागाकारांत जे घातप्रकाशक आले आहेत ते वजाबाकीनें आले आहेत; म्हणजे,

$$\begin{array}{cccc} २न+१ & न+१ & न & न-१ \\ \underline{न-१} & \underline{न-१} & \underline{न-१} & \underline{न-१} \\ न+२ & २ & १ & ० \end{array}$$

ह्या उदाहरणावरून हे उघड आहे कीं, $अ^{०}=१$

$\because \frac{अ^{न-१}}{अ^{न-१}}=अ^{०}$; परंतु $अ^{न-१}\div अ^{न-१}=१ \therefore अ^{०}=१$

साहावें. $१०अ^{२}$ ह्यांस २ ह्यांनीं; $-१२अक्ष$ ह्यांस ४अ ह्यांनीं; $२०क्ष^{४}य^{३}$ ह्यास $-५क्षय^{२}$ ह्यांनीं; आणि $-१२०$[illegible] $य^{५}ज्ञ^{४}$ ह्यांस $-१०अ^{२}क्ष^{२}य^{२}ज्ञ^{३}$ ह्यांनीं भाग

उत्तर. $५अ$; $-३क्ष$; $-४क्ष^{३}य$; आणि $१२अ^{२}य^{३}ज्ञ$

सातवें. $२अ^{३}ब^{२}-६अ^{२}ब^{३}+१२अब^{३}क$ ह्यास $२अब^{२}$ ह्यांनीं; आणि $८क्ष^{४}य^{२}-१२क्ष^{३}-१६क्ष$ ह्यांस ४क्ष ह्यांनीं भाग

उत्तर. $अ^{२}-३अब+४ब^{२}क$; आणि $२क्ष^{३}य^{२}-३क्ष^{२}-४$

आठवें. $\frac{\text{२अक्षय} - \text{५क्षय}}{\text{क्षय}}$ ; $\frac{-\text{६ब}^{२}\text{य} + \text{४अबय} - \text{२०बय}}{-\text{बय}}$

आणि $\frac{\text{४अबक्ष} - \text{३अ}^{२}\text{क्ष} + \text{७अकक्ष}}{\text{अक्ष}}$

उत्तर. २अ−५; ६ब−४अ+२०; आणि ४ब−३अ+७क

नववें. $\text{८क्ष}^{२} + \text{१६अक्ष} + \text{६अ}^{२}$ ह्यांस $\text{४क्ष} + \text{२अ}$ ह्यांनीं; आणि $\text{क्ष}^{४} + \text{क्ष}^{३}\text{य} + \text{क्षय}^{३} + \text{य}^{४}$ ह्यांस $\text{क्ष}^{२} + \text{२क्षय} + \text{य}^{२}$ ह्यांनीं भाग.

उत्तर. $\text{२क्ष} + \text{३अ}$; आणि $\text{क्ष}^{२} - \text{क्षय} + \text{य}^{२}$.

दाहावें. $\text{८क्ष}^{४}\text{य} + \text{२क्ष}^{३}\text{य} - \text{२क्ष}^{२} + \text{३क्ष}^{२}\text{य} + \text{क्ष}$ ह्यांस $\text{४क्ष}^{२}\text{य} + \text{३क्षय} - \text{१}$ ह्यांनीं; आणि $\text{क्ष}^{४} - \text{य}^{४}$ ह्यांस $\text{क्ष} - \text{य}$ ह्यांनीं भाग.

उत्तर. $\text{२क्ष}^{२} - \text{क्ष}$; आणि $\text{क्ष}^{३} - \text{क्ष}^{२}\text{य} + \text{क्षय}^{२} - \text{य}^{३}$.

अकरावें. $\text{१८क्ष}^{३} - \text{३३क्ष}^{२} + \text{४४क्ष} - \text{३५}$ ह्यांस $\text{६क्ष} - \text{७}$ ह्यांनीं; आणि $\text{१} - \text{क्ष}$ ह्यांस $\text{१} + \text{क्ष}$ ह्यांनीं भाग.

उत्तर. $\text{३क्ष}^{२} - \text{२क्ष} + \text{५}$; आणि $\text{१} - \text{२क्ष} + \text{२क्ष}^{२} - \text{२क्ष}^{३} +$ इ०

बारावें. $\frac{\text{अ}^{४} + \text{२अ}^{२}\text{ब}^{२} + \text{ब}^{४}}{\text{अ}^{२} + \text{ब}^{२}}$ ; $\frac{\text{क्ष}^{६} - \text{२क्ष}^{३}\text{य}^{३} + \text{य}^{६}}{\text{क्ष}^{३} - \text{य}^{३}}$.

उत्तर $\text{अ}^{२} + \text{ब}^{२}$; $\text{क्ष}^{३} - \text{य}^{३}$.

नेरावें. $\frac{अ^{म} ब^{न+२} - अ^{म+१} ब^{२न+१} + अ^{म+२} ब^{३न}}{अ^{म-२} ब^{न}}$;

आणि $\frac{४अ^{२}-१}{२अ+१}$

उत्तर. $अ^{२}ब^{२} - अ^{३}ब^{न+१} + अ^{४}ब^{२न}$; $२अ-१$

## अनेकप्रकारचीं उदाहरणें.

पहिलें. $क्ष=४$, $य=२$, आणि $ज्ञ=६$ धरून खालच्या तीन पदांच्या संख्या काढ.

(१) $क्ष^{२}+४य-३ज्ञ$. (२) $\frac{२क्ष+६य}{१३} - \frac{ज्ञ}{य}$

(३) $\frac{क्ष(ज्ञ-य)}{२} + \frac{ज्ञ}{क्ष-य}$.

दुसरें. $५अ^{२}ब-२अब^{२}-३अ^{२}ब^{२}$; $२अ^{२}ब^{२}-७अ^{२}ब+५अब$; आणि $अ^{२}ब^{२}-अ^{२}ब$; ह्यांची बेरीज कर.

तिसरें. $२क्ष^{३}-३क्ष^{२}+८क्ष-५$ हे $५क्ष^{३}-क्ष^{२}-२क्ष+१$ ह्यांत वजा कर.

चवथें. $४अ^{२}क्ष^{२}-७अ^{२}क्ष-३अ$ ह्यास $२अक्ष^{२}-अ^{२}$ ह्यांनीं; आणि $अ^{२}+अब+ब^{२}$ ह्यास $अ-ब$ ह्यांनीं गूण.

# समीकरणें

(८) जेव्हां दोन पदें किंवा पदांचे दोन समूह परस्परांच्या बरोबर असतात तेव्हां त्यांचें समीकरण होतें. जसें, ४×३=७+५ हें समीकरण होय, आणि १०क्ष=६० हेंही समीकरण आहे, ज्यांत क्षची किंमत ६ आहे हें उघड आहे, कारण १०×६=६० आहेत; आणि जर समीकरणाच्या दोहों बाजूंस १० ह्यांनीं भागिलें तर क्ष=६ येतील. पुनः क्ष+५=१५ हें जर एक समीकरण घेतलें आणि त्याच्या दोनही बाजूंतून ५ वजा केले तर क्ष=१० येतील. आणि क्ष−४=२० असें जर एक समीकरण घेतलें व त्याचे दोनही बाजूंत ४ मिळविले तर क्ष=२४ येतील. असेंच जर, क्ष/४=२ हें एक समीकरण घेतलें तर क्षची किंमत ८ येईल, कारण कीं ८चा चवथा हिस्सा २ आहे; आणि जर समीकरणाच्या दोनही बाजूंस ४ नीं गुणिलें तर क्ष=८ येतील.

**क्ष+२अ=८अ−२क्ष** असें एक दिलेलें समीकरण आहे.

ह्या समीकरणाच्या दोन्ही बाजूंत २क्ष मिळविल्यानें,

क्ष + २क्ष + २अ = ८अ.

ह्याचे दोन्ही बाजूंतून २अ वजा केल्यानें,

क्ष + २क्ष = ८अ − २अ

मूळ समीकरणाची आणि ह्याची तुलना करून पाहिलें असतां असें दिसतें कीं, २क्ष आणि २अ ह्यां-चीं चिन्हें बदलून त्यांस स्थळांतर केलें, म्हणजे त्यांस एका बाजूंतून काढून दुसऱ्या बाजूंस नेलें.

आतां ∵ क्ष + २क्ष = ३क्ष, आणि ८अ − २अ = ६अ;

∴ ३क्ष = ६अ.

ह्या समीकरणाचे प्रत्येक बाजूस ३ ह्यानें भागल्यानें,

क्ष = २अ येतात, हीक्ष अव्यक्त पदाची किंमत होय.

ह्यावरून असें दिसतें कीं, समीकरणांत कोणत्याही पदाचें चिन्ह बदलून स्थळांतर केलें असतां चिंता नाहीं, आणि समीकरणाच्या एके बाजूंत जो फारफेर करावा तोच समानता राखण्याकरितां दुसऱ्या बाजूंत केला पाहिजे.

## हीं पुढील समीकरणें सोडीव.

१. $\text{क्ष}+\text{३}=\text{१८}-\text{४क्ष}$ उत्तर. $\text{क्ष}=\text{३}$.

२. $\text{क्ष}+\text{३अ}=\text{१८अ}-\text{४क्ष}$. उत्तर. $\text{क्ष}=\text{३अ}$.

३. $\text{४क्ष}-\text{३अ}=\text{३क्ष}+\text{३ब}$. उत्तर. $\text{क्ष}=\text{३}(\text{अ}+\text{ब})$

४. $\text{७}+\text{६क्ष}-\text{४}=\text{१२}+\text{३क्ष}$. उत्तर. $\text{क्ष}=\text{३}$.

५. $\text{४}(\text{क्ष}-\text{२})=\text{१०क्ष}-\text{३८}$. उत्तर. $\text{क्ष}=\text{५}$.

६. $\text{अक्ष}+\text{क}=\text{अ}-\text{बक्ष}$. उत्तर. $\text{क्ष}=\frac{\text{अ}-\text{क}}{\text{अ}+\text{ब}}$.

७. $\frac{\text{य}}{\text{१२}}-\text{८}=-\text{६}$ उत्तर. $\text{य}=\text{२४}$.

८. $\text{५अज्ञ}-\text{१}=\text{२अ}(\text{ज्ञ}+\text{ब})$ उत्तर. $\text{ज्ञ}=\frac{\text{२अब}+\text{१}}{\text{३अ}}$.

## प्रश्न.

१. एके मनुष्यानें २१ रुपयांस वांसरासुद्धां एक गाय विकत घेतली, व त्यांत गाईची किंमत वांसराच्या साहा पट होती, तर एकेकाची किंमत काय?

वांसराची किंमत दाखवायास क्ष रुपये घे;

तर ∵ गाईची किंमत वांसराचे साहा पट आहे,

∴ ६ क्ष ही तिची किंमत आहे.

परंतु, प्रश्नाप्रमाणें गाईची किंमत + वांसराची किंमत = २१ रुपये आहेत.

∴ ६ क्ष + क्ष = २१

म्हणजे, ७ क्ष = २१

∴ क्ष = ३ रुपये = वांसराची किंमत

आणि ६ क्ष = १८ रुपये = गाईची .....

२. अ जवळ १०० रुपये होते आणि ब जवळ ४८ रुपये होते; ब नें कांहीं पैसा लोकांस वाटला, आणि अ नें त्याच्या दुप्पट वाटला, आणि मग अ जवळ ब च्या तिप्पट पैसा राहिला. तर प्रत्येकानें किती किती पैसा वाटला?

ब नें जे रुपये वाटले ते = क्ष रुपये

तर अ नें .............. २ क्ष.

आतां प्रत्येकाचा पैसा − त्यानें जितका पैसा वाटला तो = त्याजवळ जी बाकी राहिली ती.

∴ १०० − २ क्ष = अ जवळची बाकी,

आणि ४८ − क्ष = ब ..............

परंतु प्रश्नांत सांगितलें आहे कीं, अ ची शिल्लक ब च्या शिलकेच्या तिप्पट आहे.

∴ १०० − २ क्ष = ३(४८ − क्ष) = १४४ − ३ क्ष,

स्थलांतरानें, ३ क्ष − २ क्ष = १४४ − १००;

म्हणजे, क्ष = ४४ रुपये = बनें वांटलेला पैसा,

आणि २ क्ष = ८८ रुपये = अनें .........

३. अ, ब, आणि क, ह्या तिघांस ६०० रुपये वांटून दे, ते असे कीं, अच्या हिशाच्या दुप्पट बस मिळतील, आणि अ आणि ब ह्या दोघांच्या हिशांचे बेरजेबरोबर कस मिळतील.

उत्तर. अ १०० रुपये, ब २०० रु०, आणि क ३०० रु०

४. अशा दोन संख्या काढ कीं, ज्यांची वजाबाकी ७ असावी, आणि मोठ्या संख्येच्या तिपटीची आणि धाकट्या संख्येच्या आठपटीची वजाबाकी ६ असावी.

उत्तर. १० आणि ३

५. एक मजूर आणि त्याचा मुलगा हे दोघे मिळून ९६ रुपये मिळवितात, परंतु मजुरास मुलाच्या पांचपट मिळतात; तेव्हां एकेक किती किती मिळवितो?

उत्तर. मजूर ८० रु०, मूल १६ रु०

६. लोखंडी सडक बांधायाच्या कामांत अ आणि ब ह्या दोहों मनुष्यांनीं सारखा पैसा घातला; त्यांत अस ७०० रुपये नफा झाला, आणि बस ४५ रुपये तोटा झाला, नंतर पाहातात तों बच्या साहापट पैसा

अजवळ झाला; तेव्हां एकेकानें किती किती पैसा घातला?

उत्तर. ६०० रुपये.

७. अ फूट लांबीची एक दोरी आहे तिचे असे दोन तुकडे करायाचे आहेत कीं, एक तुकडा दुसऱ्या तुकड्याच्या लांबीच्या ब पट लांब होईल; तेव्हां एकेका तुकड्याची लांबी किती?

उत्तर. $\begin{cases} \text{धाकटा तुकडा} = \frac{\text{अ}}{\text{ब}+1} \text{ फूट}, \\ \text{आणि मोठा तुकडा} = \frac{\text{अब}}{\text{ब}+1} \text{ फूट}. \end{cases}$

जेव्हां अ=२० आणि ब=४ तेव्हां त्या तुकड्यांची लांबी किती आहे?

उत्तर ४ आणि १६

# प्रकरण २

## अपूर्णबीजपद

(९) बीजांतील अपूर्ण पदें आणि अंकगणितांतील अपूर्णांक ह्यांचें स्वरूप एकच आहे, म्हणून एकास जे नियम लागू पडतात तेच दुसऱ्यासही लागू पडतात. असें समज कीं, एका नारिंगाच्या फळाचे ब संख्ये इतके सारखे तुकडे करून त्यांपैकीं

अ तुकडे घ्यावयाचे आहेत तर ते तुकडे, त्याचे आठ सारखे तुकडे करून त्यांपैकीं पांच तुकडे घ्यावयाचे असले म्हणजे ते जसे $\frac{५}{८}$ ह्या अपूर्णसंख्येनें दाखवितों, तसेंच $\frac{अ}{ब}$ ह्या अपूर्णपदानें दाखवितों.

∵ $\frac{अ}{ब}$ हें अपूर्णपद अस बनें भागून जो भागाकार येतो तो दाखवितें, आणि ∵ भागाकार × भाजक = भाज्य

$$\therefore \frac{अ}{ब} \times ब = अ ;$$

म्हणजे, जर आपण एखाद्या अपूर्णपदास त्याचे छेदानें गुणिलें, तर आपणास त्या पदाचा अंश मिळतो.

वरील समीकरणाच्या दोन्ही बाजूंस ननें गुण, तर

$$न ब \times \frac{अ}{ब} = न अ$$

$$\therefore \frac{अ}{ब} = \frac{न अ}{न ब} ;$$

म्हणजे, कोणत्याही अपूर्णपदाचे अंश आणि छेद ह्यांस एकाच पदानें गुणिलें असतां त्याची किंमत बदलत नाहीं

कुरलरी. ∵ $\frac{\text{नअ}}{\text{नब}} = \frac{\text{अ}}{\text{ब}}$, ∴ कोणत्याही अपूर्णपदाचे अंशास आणि छेदास एकाच संख्येनें भागिलें असतां त्याची किंमत बदलत नाहीं.

## उदाहरणें.

१. $\frac{\text{क्ष}}{२}$ ह्यांस २ ह्यांनीं; $\frac{\text{क्ष}}{३}$ ह्यांस १२ ह्यांनीं; $\frac{२\text{य}}{५}$ ह्यांस १५ ह्यांनीं; आणि $\frac{३\text{य}}{४}$ ह्यांस ५ क्ष ह्यांनीं गुण.

$\frac{\text{क्ष}}{२} \times २ = \text{क्ष}$, ∵ कोणत्याही वस्तूच्या अर्धाची दुप्पट = ती सर्व वस्तू.

$\frac{\text{क्ष}}{३} \times १२ = ४\text{क्ष}$, ∵ कोणत्याही वस्तूच्या तृतीयांशाची १२ पट = १२ तृतीयांश = त्या वस्तूची ४ पट.

ह्यावरून असें दिसतें की, आपणास कोणत्याही अपूर्णपदास एकाद्या संख्येनें गुणायाचें आहे तर गुणायाचे पूर्वीं त्या संख्येस अपूर्णपदाचे छेदानें (जर निःशेष भागितां येईल तर), भागिलें असतां चिंता नाहीं.

$\frac{२\text{य}}{५} \times १५ = ६\text{य}$, ∵ $\frac{२}{५}$ ह्यांची १५ पट = $\frac{३०}{५} = ६$, अथवा ∵ $१५ \div ५ = ३$, आणि $२\text{य} \times ३ = ६\text{य}$.

$\frac{३\text{य}}{४} \times ५\text{क्ष} = \frac{१५\text{क्षय}}{४}$, ∵ $\frac{३}{४}$ ह्यांची ५ पट = $\frac{१५}{४}$, आणि $\text{य} \times \text{क्ष} = \text{क्षय}$.

२. $\frac{क्ष}{३} + \frac{३क्ष}{४} - \frac{५क्ष}{६} + \frac{३क्ष}{८} - \frac{७क्ष}{१२}$ ह्यांस २४ ह्यांनीं गूण, आणि त्या गुणाकाराची बेरीज घे.

उत्तर. $८क्ष + १८क्ष - २०क्ष + ९क्ष - १४क्ष = क्ष$.

३. $\frac{३य}{२} - \frac{२य}{५} - \frac{य}{४} + \frac{७य}{१०} - \frac{५य}{४}$ ह्यांस २० ह्यांनीं गूण, आणि त्या गुणाकारांची बेरीज घे.

उत्तर. ६य.

४. $\frac{४}{क्ष} - \frac{७}{२क्ष} + \frac{३}{८क्ष} - \frac{१}{४क्ष} + \frac{३}{२}$ ह्यांस ८ क्ष. ह्यांनीं गूण, आणि त्या गुणाकारांची बेरीज घे.

उत्तर. $१२क्ष - ११$.

५. $\frac{क्ष^{३}}{५} + \frac{५}{क्ष} - \frac{क्ष}{१०} - \frac{२}{क्ष^{२}} + ३$ ह्यांस $१०क्ष^{२}$ ह्यांनीं गूण.

उत्तर. $क्ष^{४} + ३०क्ष^{३} + ५०क्ष - २०$.

हीं उदाहरणं केल्यानें विद्यार्थ्यांस समीकरणांचे छेद सोडवितां येतील.

## दृढभाजक.

(१०) कोणत्याही पदाचा भाजक[+] तोच होय कीं ज्यानें

---

\+ येथें भाजक हा शब्द बराबर नाहीं. कारण, ह्याचा अर्थ ज्यानें आपण भागतों तो इतकाच आहे, म्हणून सामान्य मोप किंवा दुसरा कांहीं तरी वरील अर्थसूचक शब्द असावा; परंतु हा शब्द फार दिवस प्रचारांत आहे म्हणून तोच येथें घेतला आहे.

त्या पदास भागिलें असतां भागाकार निःशेष येतो. जसें, २ हा २अ चा भाजक आहे; अक्ष हा अक्ष$^{2}$ ह्याचा भाजक आहे; अ+ब हा (अ+ब)अ ह्याचा भाजक आहे.

दोन किंवा अधिक पदांचा सामान्य भाजक तोच होय, की ज्यानें त्या पदास भागिलें असतां भागाकार निःशेष येतो; आणि त्यांचा दृढ भाजक तोच होय की, जो त्यांच्या सामान्य भाजकांमध्यें अति मोठा असतो. जसें, अ हा २अ, ६ अक्ष आणि ४ अक्ष$^{2}$, ह्यांचा सामान्य भाजक आहे; आणि त्यांचा दृढभाजक २अ हा आहे. असेंच, ३(अ+ब) हा ६(अ+ब)$^{2}$, ९(अ$^{2}$–ब$^{2}$), आणि १२(अ$^{3}$–ब$^{3}$) ह्यांचा दृढभाजक आहे, कारण ६(अ+ब)$^{2}$ = ६(अ+ब)(अ+ब), ९(अ$^{2}$–ब$^{2}$) = ९(अ+ब)(अ–ब), आणि १२(अ$^{3}$–ब$^{3}$) = १२(अ+ब)(अ$^{2}$–अब+ब$^{2}$); येथें ३(अ+ब) हा दृढभाजक आहे, हें उघडच आहे.

७. ह्याप्रकारें पदांचे निरनिराळे तुकडे करण्याची रीति विद्यार्थ्यांस त्या पदांचा दृढभाजक काढण्यास फार

उपयोगीं पडते

## उदाहरणें.

१. $क्ष^{२}+२क्ष-३$ आणि $क्ष^{२}+५क्ष+६$ ह्यांचा दृढभाजक काढ.

$$क्ष^{२}+२क्ष-३ = क्ष^{२}+३क्ष-क्ष-३ = (क्ष+३)क्ष-(क्ष+३)$$
$$= (क्ष-१)(क्ष+३)$$
$$क्ष^{२}+५क्ष+६ = क्ष^{२}+३क्ष+२क्ष+६ = क्ष(क्ष+३)+२(क्ष+३)$$
$$= (क्ष+२)(क्ष+३)$$

∴ $क्ष+३$ हा त्यांचा दृढभाजक आहे.

$क्ष^{२}+२क्ष-३$ आणि $क्ष^{२}+५क्ष+६$ हीं जर एकाद्या अपूर्ण पदाचीं अंशछेदात्मक पदें असतील तर त्यांच्या अंशास आणि छेदास ह्यांच्या $क्ष+३$ ह्या दृढभाजकानें भागिलें असतां त्या अपूर्णपदास अतिसंक्षेपरूप देतां येईल; म्हणजे,

$$\frac{क्ष^{२}+२क्ष-३}{क्ष^{२}+५क्ष+६} = \frac{(क्ष+३)(क्ष-१)}{(क्ष+३)(क्ष+२)} = \frac{क्ष-१}{क्ष+२}$$

= ह्या अपूर्णपदाचें अतिसंक्षेपरूप.

२. $\frac{क्ष^{३}-६क्ष^{२}+११क्ष-६}{क्ष^{३}+४क्ष^{२}+क्ष-६}$ ह्या अपूर्ण पदाच्या अति-

छेदांचा दृढभाजक काढ, आणि त्यास अतिसंक्षेपरूप दे.

$$\frac{\text{क्ष}^{३} - \text{६क्ष}^{२} + \text{११क्ष} - \text{६}}{\text{क्ष}^{३} + \text{४क्ष}^{२} + \text{क्ष} - \text{६}} = \frac{\text{क्ष}^{३} - \text{क्ष}^{२} - \text{५क्ष}^{२} + \text{५क्ष} + \text{६क्ष} - \text{६}}{\text{क्ष}^{३} - \text{क्ष}^{२} + \text{५क्ष}^{२} - \text{५क्ष} + \text{६क्ष} - \text{६}}$$

$$= \frac{\text{क्ष}^{२}(\text{क्ष}-\text{१}) - \text{५क्ष}(\text{क्ष}-\text{१}) + \text{६}(\text{क्ष}-\text{१})}{\text{क्ष}^{२}(\text{क्ष}-\text{१}) + \text{५क्ष}(\text{क्ष}-\text{१}) + \text{६}(\text{क्ष}-\text{१})} = \frac{(\text{क्ष}-\text{१})(\text{क्ष}^{२}-\text{५क्ष}+\text{६})}{(\text{क्ष}-\text{१})(\text{क्ष}^{२}+\text{५क्ष}+\text{६})}$$

$$= \frac{\text{क्ष}^{२}-\text{५क्ष}+\text{६}}{\text{क्ष}^{२}+\text{५क्ष}+\text{६}}$$ हें त्या अपूर्णपदाचें अतिसंक्षेपरूप, आणि $\text{क्ष}-\text{१}$ हा दृढभाजक.

३. $\frac{\text{क्ष}^{२} - \text{९क्ष} + \text{२०}}{\text{क्ष}^{२} + \text{६क्ष} - \text{५५}}$ त्या अपूर्णपदाच्या अंशछेदांचा दृढभाजक काढून त्यास अतिसंक्षेपरूप दे.

$$\frac{\text{क्ष}^{२} - \text{९क्ष} + \text{२०}}{\text{क्ष}^{२} + \text{६क्ष} - \text{५५}} = \frac{\text{क्ष}^{२} - \text{५क्ष} - \text{४क्ष} + \text{२०}}{\text{क्ष}^{२} - \text{५क्ष} + \text{११क्ष} - \text{५५}}$$

$$= \frac{\text{क्ष}(\text{क्ष}-\text{५}) - \text{४}(\text{क्ष}-\text{५})}{\text{क्ष}(\text{क्ष}-\text{५}) + \text{११}(\text{क्ष}-\text{५})} = \frac{(\text{क्ष}-\text{५})(\text{क्ष}-\text{४})}{(\text{क्ष}+\text{११})(\text{क्ष}-\text{५})} = \frac{\text{क्ष}-\text{४}}{\text{क्ष}+\text{११}}$$ हें त्या अपूर्णपदाचें अतिसंक्षेपरूप, आणि $\text{क्ष}-\text{५}$ हा दृढभाजक.

४. $\frac{\text{क्ष}^{३} + \text{क्ष}^{२}\text{य} + \text{क्षय}^{२} + \text{य}^{३}}{\text{क्ष}^{४} - \text{य}^{४}}$ त्या अपूर्णपदाचे अंशछेदांचा दृढभाजक काढून त्यास अतिसंक्षेपरूप दे.

$$\frac{\text{क्ष}^{३} + \text{क्ष}^{२}\text{य} + \text{क्षय}^{२} + \text{य}^{३}}{\text{क्ष}^{४} - \text{य}^{४}} = \frac{\text{क्ष}(\text{क्ष}^{२}+\text{य}^{२}) + \text{य}(\text{क्ष}^{२}+\text{य}^{२})}{(\text{क्ष}^{२}+\text{य}^{२})(\text{क्ष}^{२}-\text{य}^{२})} = \frac{\text{क्ष}+\text{य}}{\text{क्ष}^{२}-\text{य}^{२}}$$

हें त्या अपूर्णपदाचें अतिसंक्षेपरूप, आणि $\text{क्ष}^{२}+\text{य}^{२}$ हा दृढभाजक.

५. $\dfrac{\text{अब}+२\text{अ}^२-३\text{ब}^२-४\text{बक}-\text{अक}-\text{क}^२}{९\text{अक}+२\text{अ}^२-५\text{अब}+४\text{क}^२+८\text{बक}-१२\text{ब}^२}$ ह्या

अपूर्णपदाचे अंशच्छेदांचा दृढभाजक काढून ह्यास अतिसंक्षेप रूप दे.

$$\frac{\text{अब}+२\text{अ}^२-३\text{ब}^२-४\text{बक}-\text{अक}-\text{क}^२}{९\text{अक}+२\text{अ}^२-५\text{अब}+४\text{क}^२+८\text{बक}-१२\text{ब}^२}$$

$$=\frac{२\text{अ}^२+\text{अक}+३\text{अब}-२\text{अब}-\text{बक}-३\text{ब}^२-२\text{अक}-\text{क}^२-३\text{बक}}{२\text{अ}^२-८\text{अब}+८\text{अक}+\text{अक}-४\text{बक}+४\text{क}^२+३\text{अब}-१२\text{ब}^२+१२\text{बक}}$$

$$=\frac{\text{अ}(२\text{अ}+\text{क}+३\text{ब})-\text{ब}(२\text{अ}+\text{क}+३\text{ब})-\text{क}(२\text{अ}+\text{क}+३\text{ब})}{२\text{अ}(\text{अ}-४\text{ब}+४\text{क})+\text{क}(\text{अ}-४\text{ब}+४\text{क})+३\text{ब}(\text{अ}-४\text{ब}+४\text{क})}$$

$$=\frac{(\text{अ}-\text{ब}-\text{क})(२\text{अ}+\text{क}+३\text{ब})}{(\text{अ}-४\text{ब}+४\text{क})(२\text{अ}+\text{क}+३\text{ब})}=\frac{\text{अ}-\text{ब}-\text{क}}{\text{अ}-४\text{ब}+४\text{क}}$$ हें त्या

अपूर्णपदाचें अतिसंक्षेपरूप, आणि (२अ+क+३ब) हा दृढभाजक.

(११) जेव्हां एक पद दुसऱ्या पदांत बाकी न राहतां कितीएक वेळां जातें तेव्हां त्या दुसऱ्या पदास पहिल्या पदाची तितकीपट आहे असें म्हणतात; जसें ६अ हें २अची ३ पट आहे, आणि नक्ष ही क्षची नपट आहे.

जर एक पद दुसऱ्या पदास निःशेष भागितें तर तें पद त्या दुसऱ्या पदाच्या कोणत्याही पटीसही निःशेष भागील. असें समज कीं ब, अमध्यें म वेळां जातो,

तर अ = मब, आणि न अ ही अवीनपद आहे, ता न अ = न म ब ; म्हणून ब, न अ मध्यें न म वेळां जातो.

जर एक पद दुसऱ्या दोन पदांस निःशेष भागितें तर ते पद त्यांच्या बेरजेस आणि वजाबाकीस ही निःशेष भागील. जर क्ष, अ मध्यें म वेळां आणि ब मध्यें न वेळां जातो, तर अ = मक्ष, आणि ब = नक्ष, ∴ अ±ब = मक्ष ± नक्ष = (म±न) क्ष, म्हणून (अ+ब) ह्या बेरजेंत क्ष, (म+न) वेळां जातो आणि (अ−ब) ह्या वजाबाकींत (म−न) वेळां जातो.

आतां आपणास दोन संख्यांचा दृढभाजक काढण्याचा एक साधारण नियम बांधितां येईल.

ज्या दोन संख्यांचा दृढभाजक काढावयाचा आहे त्या दाखविण्यास अ आणि ब घे, आणि ज्यांत अ > ब म्हणजे अ, ब पेक्षां अधिक आहे असे मान.

असें समज कीं, ब, अ मध्यें प वेळां जाऊन बाकी क राहतो; तर अ = पब + क,

आणखी असें समज कीं क, ब मध्यें क वेळां

जाऊन बाकी ड राहतो; तर ब = कक+ड.

आणखी असें समजकीं ड, कमध्यें र वेळां जाऊन बाकी • राहते, तर क = डर.

ब) अ (प
पब
क) ब (क
कक
ड) क (ड
डर
०

आतां ∵ ड, कस निःशेष भागितो, ∴ ड, ककस आणि कक+ड त्यास म्हणजे बस निःशेष भागितो;

∴ ड, पबस आणि पब+क त्यास म्हणजे अ-स निःशेष भागितो.

त्यावरून हें उघड आहे कीं, शेवटला भाजक ड, अस आणि बस निःशेष भागितो म्हणून ड हा त्यांचा दृढभाजक आहे.

कारण ड हा त्यांचा दृढभाजक आहे असें

मान तर,

∵ तो अस आणि बस निःशेष भागितो, ∴ तो अ आणि पब, आणि (अ-पब) म्हणजे क, ह्यांस ही प्रत्येकीं निःशेष भागितो.

∴ तो कम आणि ब-ककस म्हणजे डस निःशेष भागतो.

म्हणून अ आणि ब त्यांचा जो दृढभाजक ड' हा डस निःशेष भागितो;

आणि ∵ ड हा अ आणि ब त्यांचा साधारण भाजक आहे आणखी ∵ जो दृढभाजक डस निःशेष भागितो तो ड बरोबर असला पाहिजे.

∴ ड'=ड; म्हणून शेवटला भाज्य जो ड तोच दृढभाजक आहे.

ह्यावरून असा नियम निघतो कीं, मोठ्या संख्येस धाकट्या संख्येनें भाग आणि त्या भाजकास बाकीनें भाग, असें, बाकी शून्य राही तोंपर्यंत कर; शेवटला जो भाज्य तो दृढभाजक होईल.

हा नियम दाहाव्या कलमांतील उदाहरणांस लागू आहे.

# लघुत्तमसाधारण गुणाकार.

कोणत्याही पदांचा साधारण गुणाकार तोच होय, कीं ज्यास त्या पदांनीं भागिलें असतां बाकी राहात नाहीं, आणि त्यांचा लघुत्तमसाधारण गुणाकार तोच होय कीं जो साधारण गुणाकारांत अति लहान असतो.

अ आणि ब ह्या पदांचा साधारण भाजक म आहे आणि $\frac{अ}{म}=प$, आणि $\frac{ब}{म}=फ$ आहे, असें मान; तर गुणाकारानें $\frac{अब}{म^२}=पफ$, $\frac{अब}{म}=मपफ=अफ$ किंवा पब.

$\therefore$ $\frac{अब}{म}$ हा अ आणि ब ह्यांचा साधारण गुणाकार आहे. परंतु म जेव्हां अतिमोठा आहे तेव्हां $\frac{अब}{म}$ अति लहान आहे; म्हणजे,

$$\frac{अब}{दृढभाजक}=\text{अ आणि ब ह्यांचा लघुत्तमसाधारण}$$

गुणाकार.

ह्यावरून असा नियम निघतो, कीं दोनपदांचा गुणाकार घेऊन त्या गुणाकारास त्यांच्या दृढभाजकानें भागावें, जो भागाकार तो त्यांचा लघुत्तमसाधा-

रण गुणाकार होईल.

किती ही जरी पदें असलीं तरी त्याविषयीं वरचे प्रमाणेंच सिद्ध करतां येईल

लघुत्तमसाधारण गुणाकार बहुतकरून अटकळीनें ही काढतां येईल.

उदा० १. $\frac{३क्ष^{३} - ३क्ष^{२}य + क्षय^{२} - य^{३}}{४क्ष^{२} - क्षय - ३य^{२}}$ ह्या अपूर्ण पदाच्या अंशछेदांचा दृढभाजक काढ, आणि त्यास अतिसंक्षेप रूप दे.

येथें ४क्ष^२, ३क्ष^३ ह्यांत जात नाहींत म्हणून भागाकार करण्याच्या अगोदर अंशास ४ ह्यांनीं गूण; चार हा गुणक एकाच पदास म्हणजे अंशास लावल्यानें दृढभाजकास काहीं बाध येणार नाहीं हें अगदीं स्पष्ट आहे.

$$४क्ष^{२} - क्षय - ३य^{२})\ १२क्ष^{३} - १२क्ष^{२}य + ४क्षय^{२} - ४य^{३}\ (३क्ष - ९य$$

$$१२क्ष^{३} - ३क्ष^{२}य - ९क्षय^{२}$$

$$- ९क्ष^{२}य + १३क्षय^{२} - ४य^{३}$$ त्यास ४ ह्यांनी गूण.

$$- ३६क्ष^{२}य + ५२क्षय^{२} - १६य^{३}$$

$$- ३६क्ष^{२}य + ९क्षय^{२} + २७य^{३}$$

$$४३क्षय^{२} - ४३य^{३}$$

ह्यांतून ४३य हा गुणक काढून टाक

$$क्ष-य)\ ४क्ष^२-क्षय-३य^२\ (४क्ष+३य$$
$$४क्ष^२-४क्षय$$
$$३क्षय-३य^२$$
$$३क्षय-३य^२$$

∴ क्ष-य हा दृढभाजक आहे, आणि त्यानें अपूर्णपदाच्या दोन्ही पदांस भागल्यानें,

$$\frac{३क्ष^३-३क्ष^२य+क्षय^२-य^३}{४क्ष^२-क्षय-३य^२}=\frac{३क्ष^२+य^२}{४क्ष+३य}$$ हें उत्तर.

उदा० २. असें दाखवा कीं, $\frac{क्ष^६+क्ष^{-२}-(क्ष^{-६}+क्ष^२)}{क्ष^३+क्ष-(क्ष^{-३}+क्ष^{-१})}=\frac{क्ष^४+क्ष^{-४}}{क्ष+क्ष^{-१}}$

$$\frac{क्ष^६+क्ष^{-२}-(क्ष^{-६}+क्ष^२)}{क्ष^३+क्ष-(क्ष^{-३}+क्ष^{-१})}=\frac{क्ष^{-२}(क्ष^८+१)-क्ष^{-६}(१+क्ष^८)}{क्ष(क्ष^२+१)-क्ष^{-३}(१+क्ष^२)}$$

$$=\frac{(क्ष^{-२}-क्ष^{-६})(१+क्ष^८)}{(क्ष-क्ष^{-३})(१+क्ष^२)}=\frac{क्ष^{-६}(क्ष^४-१)(१+क्ष^८)}{क्ष^{-३}(क्ष^४-१)(१+क्ष^२)}$$

$$=\frac{क्ष^{-४}(१+क्ष^८)}{क्ष^{-१}(क्ष^२+१)}=\frac{क्ष^४+क्ष^{-४}}{क्ष+क्ष^{-१}}$$ हें उत्तर.

ह्या पुढील पदांचे दृढभाजक काढ.

१. $क्ष^२+क्ष-२$ आणि $क्ष^२+२क्ष-३$

उत्तर. क्ष-१

२. $६अ^२ + ११ अक्ष + ३क्ष^२$ आणि $६अ^२ + ७अक्ष − ३क्ष^२$. उत्तर $२अ + ३क्ष$.

३. $८अ^३ब^२ − १०अब^३ + २ब^४$ आणि $१०अ^४ब − १०अ^३ब^२ + २अ^३ब^२ − ३अब^४$. उत्तर $अब − ब^२$.

४. $क्ष^३ + २क्ष^२ + २क्ष + १$ आणि $क्ष^३ − २क्ष − १$.

उत्तर $क्ष + १$.

५. $२क्ष^२ − क्षय − ६य^२$ आणि $३क्ष^२ − ८क्षय + ४य^२$.

उत्तर $क्ष − २य$.

६. $२क्ष^३ − ३क्ष^२ − २क्ष + ३$ आणि $३क्ष^४ + २क्ष^३ − २क्ष^२ − २क्ष − १$. उत्तर $क्ष^२ − १$.

ह्या पुढील अपूर्णपदांस अतिसंक्षेपरूप दे

७. $\frac{क्ष^२ + २अक्ष + अ^२}{क्ष^२ − अ^२}$ आणि $\frac{क्ष^२ − २क्षय + य^२}{क्ष^२ − य^२}$.

उत्तर $\frac{क्ष + अ}{क्ष − अ}$ आणि $\frac{क्ष − य}{क्ष + य}$

८. $\frac{अ^३ + ब^३}{(अ + ब)^२}$ आणि $\frac{(अ + ब)^३}{अ^२ − ब^२}$

उत्तर $\frac{अ^२ − अब + ब^२}{अ + ब}$ आणि $\frac{(अ + ब)^२}{अ − ब}$.

९. $\frac{\text{क्ष}^{२}+\text{क्ष}-२}{२\text{क्ष}^{२}-३\text{क्ष}+१}$ आणि $\frac{\text{क्ष}^{३म}+\text{क्ष}^{२म}-२}{\text{क्ष}^{३म}+\text{क्ष}^{म}-२}$.

उत्तर $\frac{\text{क्ष}+२}{२\text{क्ष}-१}$ आणि $\frac{\text{क्ष}^{२म}+२\text{क्ष}^{म}+२}{\text{क्ष}^{म}+२}$

१०. $\frac{\text{क्ष}^{३}-\text{क्ष}^{२}\text{य}-\text{क्षय}^{२}+\text{य}^{३}}{\text{क्ष}^{२}-\text{य}^{२}}$ आणि $\frac{३\text{क्ष}^{३}-२२\text{क्ष}-१५}{२\text{क्ष}^{३}-१७\text{क्ष}^{२}+१८\text{क्ष}}$.

उत्तर $\frac{\text{क्ष}-\text{य}}{\text{क्ष}+\text{य}}$ आणि $\frac{३\text{क्ष}^{२}+९\text{क्ष}+५}{२\text{क्ष}^{३}-२\text{क्ष}^{२}-६\text{क्ष}}$.

## बीजांतील अपूर्णपदांची बेरीज, वजाबाकी, गुणाकार, आणि भागाकार.

### उदाहरणं.

१. $\frac{२\text{क्ष}-५}{३}$ आणि $\frac{\text{क्ष}^{२}-१}{२\text{क्ष}}$ ह्यांची बेरीज कर.

येथं छेदांचा लघुतमसाधारणगुणाकार ६क्ष आहे, आणि पहिल्या अपूर्णपदाच्या दोन्ही पदांस २क्ष ह्यांनीं आणि दुसऱ्याच्या दोन्ही पदांस ३ ह्यांनीं गुणलें म्हणजे दोनही अपूर्णपदें समच्छेद होतील; म्हणजे

$$\left.\begin{aligned}\frac{२क्ष-५}{३}\times\frac{२क्ष}{२क्ष}&=\frac{४क्ष^{२}-१०क्ष}{६क्ष}\\ \frac{क्ष-१}{२क्ष}\times\frac{३}{३}&=\frac{३क्ष-३}{६क्ष}\end{aligned}\right\}\therefore\frac{४क्ष^{२}-७क्ष-३}{६क्ष}\text{ ही बेरीज.}$$

२. $\frac{अ}{२}-\frac{ब}{३}+\frac{क}{५}$, $\frac{अ}{४}-\frac{ब}{५}-\frac{क}{३}$, आणि $\frac{अ}{३}+\frac{ब}{४}+\frac{क}{२}$ ह्या अपूर्णपदांची बेरीज करा.

$$\left.\begin{aligned}\frac{अ}{२}-\frac{ब}{३}+\frac{क}{५}&=\frac{६अ}{१२}-\frac{२०ब}{६०}+\frac{६क}{३०}\\ \frac{अ}{४}-\frac{ब}{५}-\frac{क}{३}&=\frac{३अ}{१२}-\frac{१२ब}{६०}-\frac{१०क}{३०}\\ \frac{अ}{३}+\frac{ब}{४}+\frac{क}{२}&=\frac{४अ}{१२}+\frac{१५ब}{६०}+\frac{१५क}{३०}\end{aligned}\right\}\therefore\frac{१३अ}{१२}-\frac{१७ब}{६०}+\frac{११क}{३०}\text{ ही बेरीज}$$

३. $\frac{५क्ष^{२}}{२}-\frac{७य^{२}}{३}$, $-\frac{४क्ष^{२}}{३}+\frac{५य^{२}}{२}$, आणि $\frac{७क्ष^{२}}{४}-\frac{३य^{२}}{२}$ ह्या अपूर्णपदांची बेरीज घ्या.

$$\left.\begin{aligned}\frac{५क्ष^{२}}{२}-\frac{७य^{२}}{३}&=\frac{३०क्ष^{२}}{१२}-\frac{१४य^{२}}{६}\\ -\frac{४क्ष^{२}}{३}+\frac{५य^{२}}{२}&=\frac{-१६क्ष^{२}}{१२}+\frac{१५य^{२}}{६}\\ \frac{७क्ष^{२}}{४}-\frac{३य^{२}}{२}&=\frac{२१क्ष^{२}}{१२}-\frac{९य^{२}}{६}\end{aligned}\right\}\therefore\frac{३५क्ष^{२}}{१२}-\frac{८य^{२}}{६}=२\frac{११}{१२}क्ष^{२}-१\frac{१}{३}य^{२}=\text{ बेरीज.}$$

४. $\frac{३}{४(१-क्ष)^२} + \frac{३}{८(१-क्ष)} + \frac{१}{८(१-क्ष)} - \frac{१-क्ष}{४(१+क्ष^२)}$

ह्यांचें एक अपूर्ण पद कर .

दुसरें आणि तिसरें अपूर्णपद घे आणि तीं समच्छेद करून आद

$$\frac{३}{८(१-क्ष)} \times \frac{१+क्ष}{१+क्ष} = \frac{३+३क्ष}{८(१-क्ष^२)}$$

$$\frac{१}{८(१+क्ष)} \times \frac{१-क्ष}{१-क्ष} = \frac{१-क्ष}{८(१-क्ष^२)}$$

ह्यांची बेरीज घेतल्यानें, $\frac{४+२क्ष}{८(१-क्ष^२)} = \frac{२+क्ष}{४(१-क्ष^२)}$

हें पद आणि चवथें अपूर्ण पद घेऊन तीं समच्छेद कर

$$\frac{२+क्ष}{४(१-क्ष^२)} \times \frac{१+क्ष^२}{१+क्ष^२} = \frac{क्ष^३+२क्ष^२+क्ष+२}{४(१-क्ष^४)}$$

$$\frac{१-क्ष}{४(१+क्ष^२)} \times \frac{१-क्ष^२}{१-क्ष^२} = \frac{१-क्ष-क्ष^२+क्ष^३}{४(१-क्ष^४)}$$

ह्यांची वजाबाकी घेतल्यानें, $\frac{३क्ष^२+२क्ष+१}{४(१-क्ष^४)}$

हें पद आणि पहिलें अपूर्ण पद घे आणि ह्यांचा छेदां-

चा लघुतमसाधारणगुणाकार काढून हीं समच्छेद कर

$$४(१-क्ष)\overline{)\,४(१-क्ष)^२,\ ४(१-क्ष^२)\cdot(१+क्ष^२)}$$
$$(१-क्ष)(१+क्ष)(१+क्ष^२) = ४(१-क्ष)(१-क्ष^२)$$
$$= ल॰ सा॰ गु॰$$

$$\frac{३}{४(१-क्ष)^२} \times \frac{१+क्ष+क्ष^२+क्ष^३}{१+क्ष+क्ष^२+क्ष^३} = \frac{३+३क्ष+३क्ष^२+३क्ष^३}{४(१-क्ष)(१-क्ष^४)}$$

$$\frac{१+२क्ष+३क्ष^२}{४(१-क्ष^४)} \times \frac{१-क्ष}{१-क्ष} = \frac{१+क्ष+क्ष^२-३क्ष^३}{४(१-क्ष)(१-क्ष^४)}$$

ह्यांची बेरीज घतल्यानं, $\frac{४+४क्ष+४क्ष^२}{४(१-क्ष)(१-क्ष^४)} = \frac{१+क्ष+क्ष^२}{१-क्ष-क्ष^४+क्ष^५}$

$अ+ब$ आणि $\frac{अ}{२}-\frac{ब}{२}$ ह्यांची वजाबाकी कर

$$अ+ब = \frac{२अ}{२}+\frac{२ब}{२}$$
$$\frac{अ}{२}-\frac{ब}{२}$$
$$\overline{\frac{अ}{२}+\frac{३ब}{२} = बाकी.}$$

६. $\frac{अ}{३}+\frac{ब}{२}-\frac{क}{४}$ आणि $\frac{अ+ब}{४}-\frac{क}{८}$ ह्यांची वजाबाकी कर

$$\frac{\text{अ}}{३}+\frac{\text{ब}}{२}-\frac{\text{क}}{४}=\frac{४\text{अ}}{१२}+\frac{६\text{ब}}{१२}-\frac{२\text{क}}{८}$$

$$\frac{\text{अ}+\text{ब}}{४}-\frac{\text{क}}{८}=\frac{३\text{अ}}{१२}+\frac{३\text{ब}}{१२}-\frac{\text{क}}{८}$$

$$\frac{\text{अ}}{१२}+\frac{३\text{ब}}{१२}-\frac{\text{क}}{८}=\frac{\text{अ}+३\text{ब}}{१२}-\frac{\text{क}}{८}$$

७. $\frac{\text{क्ष}}{\text{क्ष}-२}$ आणि $\frac{\text{क्ष}}{\text{क्ष}-३}$ ह्यांची बेरीज आणि वजाबाकी कर.

$$\frac{\text{क्ष}}{\text{क्ष}-२}\times\frac{\text{क्ष}-३}{\text{क्ष}-३}=\frac{\text{क्ष}^२-३\text{क्ष}}{\text{क्ष}^२-५\text{क्ष}+६}$$

$$\frac{\text{क्ष}}{\text{क्ष}-३}\times\frac{\text{क्ष}-२}{\text{क्ष}-२}=\frac{\text{क्ष}^२-२\text{क्ष}}{\text{क्ष}^२-५\text{क्ष}+६}$$

ह्यांचे बेरजेनें, $\frac{२\text{क्ष}^२-५\text{क्ष}}{\text{क्ष}^२-५\text{क्ष}+६}$, व वजाबाकीनें, $\frac{-\text{क्ष}}{\text{क्ष}^२-५\text{क्ष}+६}$.

८. $\frac{४\text{क्ष}^२-१}{८}$ ह्यास $\frac{२\text{क्ष}+१}{२\text{क्ष}-१}$ ह्यांनीं; आणि $\frac{२\text{अ}^२}{\text{अ}^२-\text{ब}^२}$ ह्यास $\frac{(\text{अ}+\text{ब})^२}{४\text{ब}^२\text{अ}^२}$ ह्यांनीं गुण.

$$\frac{४\text{क्ष}^२-१}{८}\times\frac{२\text{क्ष}+१}{२\text{क्ष}-१}=\frac{(२\text{क्ष}+१)(२\text{क्ष}-१)}{८}\times\frac{२\text{क्ष}+१}{२\text{क्ष}-१}$$

$$\frac{(२\text{क्ष}+१)(२\text{क्ष}+१)}{८}=\frac{४\text{क्ष}^२+४\text{क्ष}+१}{८}$$

$$\frac{२\text{अ}^२}{\text{अ}^२-\text{ब}^२}\times\frac{(\text{अ}+\text{ब})^२}{४\text{अ}^२\text{ब}^२}=\frac{२\text{अ}^२}{(\text{अ}+\text{ब})(\text{अ}-\text{ब})}\times\frac{(\text{अ}+\text{ब})(\text{अ}+\text{ब})}{२\text{अ}^२\times२\text{ब}^२}$$

$$=\frac{\text{अ}+\text{ब}}{२\text{ब}^२(\text{अ}-\text{ब})}$$

९. $\frac{\text{अ}+१}{\text{ब}}$ ह्यांस $\frac{१+\frac{१}{\text{अ}}}{\text{ब}}$ ह्यांनीं; आणि $\left(\frac{१}{\text{अ}}+\frac{१}{\text{ब}}\right)$ ह्यांस $\left(\frac{१}{\text{अ}}-\frac{१}{\text{ब}}\right)$ ह्यांनीं भाग.

$$\frac{\text{अ}+१}{\text{ब}}\div\frac{१+\frac{१}{\text{अ}}}{\text{ब}}=\frac{\text{अ}+१}{\text{ब}}\div\frac{{}^*\text{अ}+१}{\text{बअ}}=\frac{\text{अ}+१}{\text{ब}}\times\frac{\text{बअ}}{\text{अ}+१}=\text{अ}.$$

$$\left(\frac{१}{\text{अ}}+\frac{१}{\text{ब}}\right)\div\left(\frac{१}{\text{अ}}-\frac{१}{\text{ब}}\right)=\frac{\text{ब}+\text{अ}}{\text{अब}}\div\frac{\text{ब}-\text{अ}}{\text{अब}}$$

$$=\frac{\text{ब}+\text{अ}}{\text{अब}}\times\frac{\text{अब}}{\text{ब}-\text{अ}}=\frac{\text{अ}+\text{ब}}{\text{ब}-\text{अ}}.$$

९ $\frac{\text{क्ष}^२-(\text{अ}+\text{ब})\text{क्ष}+\text{अब}}{\text{क्ष}^२-(\text{अ}-\text{ब})\text{क्ष}-\text{अब}}$ ह्यांस $\frac{\text{क्ष}+\text{ब}}{\text{क्ष}-\text{ब}}$ ह्यांनीं गूण.

$$\frac{\text{क्ष}^२-(\text{अ}+\text{ब})\text{क्ष}+\text{अब}}{\text{क्ष}^२-(\text{अ}-\text{ब})\text{क्ष}-\text{अब}}=\frac{\text{क्ष}^२-\text{बक्ष}-\text{अक्ष}+\text{अब}}{\text{क्ष}^२+\text{बक्ष}-\text{अक्ष}-\text{अब}}$$

$$=\frac{\text{क्ष}(\text{क्ष}-\text{ब})-\text{अ}(\text{क्ष}-\text{ब})}{\text{क्ष}(\text{क्ष}+\text{ब})-\text{अ}(\text{क्ष}+\text{ब})}=\frac{(\text{क्ष}-\text{अ})(\text{क्ष}-\text{ब})}{(\text{क्ष}-\text{अ})(\text{क्ष}+\text{ब})}=\frac{\text{क्ष}-\text{ब}}{\text{क्ष}+\text{ब}},$$

---

* भाज्यपदाच्या दोहीं पदांस अनें गुणून हें पद आलें आहे.

